# फ रा री

[ दिग्दर्शनाच्या खास सूचनांसह ]

मो. ग. रांगणेकर

रामकृष्ण बुक डेपो
गिरगांव, मुंबई ४

# नाटक बसवण्यापूर्वी—

पुष्कळदां आपण पाहातों कीं, मुळांत चांगल्या असलेल्या नाटकाचा जेव्हां प्रयोग केला जातो, तेव्हां तो कंटाळवाणा होतो. विशेषतः व्यावसायिक कंपन्या करीत असलेल्या नाटकांचे प्रयोग जेव्हां ॲमेच्युअर्स संस्था करतात, तेव्हां तर हा दोष ठळकपणें दिसून येतो. खरे म्हटलें, तर एखादें साधारण नाट्यगुण असलेलें नाटकहि, दिग्दर्शनाच्या कौशल्यामुळें, रंगभूमीवर प्रेक्षणीय वाटतें उलट, ही दिग्दर्शनाची दृष्टि नसेल, तर चांगल्या नाटकाचीहि माती होते. यासाठीं ॲमेच्युअर्स संस्थांना मार्गदर्शन व्हावें, म्हणून काहीं एकांकिकांची, दिग्दर्शनाच्या सूचनांसह, पुस्तकें प्रसिद्ध करण्याची अभिनव योजना अंमलांत आणण्यांत येत आहे.

' नाटक बसवणें ' म्हणजे काय, याची खरोखरच कांहीं जुन्या नटश्रेष्ठांना देखील नीटशी जाणीव असलेली दिसत नाहीं. ' नाटक बसवणे ' म्हणजे नक्कल तोंडपाठ करणें, शब्दोच्चार स्पष्ट करणें आणि ' पिट ' पर्यंत ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें बोलणें, यापेक्षां त्यांना जाणीव असलेली दिसत नाहीं. फार फार तर शब्दांतील आशयाप्रमाणें हातवारे केले म्हणजे झालें. या बाबतींत जुन्या तालीम मास्तरांच्या अनेक नवलकथा मी ऐकलेल्या आहेत. अर्थातच, जुन्या नाटकांत पात्रें संवादापेक्षां संभाषणच जास्त बोलत असल्यामुळें, हीं संभाषणें चोख पाठ करून घेणें, हेंच तालीममास्तराचें मुख्य काम असे. नाटककारानें जें लिहिलें

आहे तें प्रेक्षकांपर्यंत पोंचवणें, एवढेंच नटाचें काम. अर्थातच, पूर्वीच्या नाटकांचा भर त्यांतील संगीतावर असल्यामुळें पात्रें काय बडबडतात, इकडे प्रेक्षक सहसा मनापासून लक्ष देत नसत. त्यांच्या अभिनयाकडेहि त्यांचें लक्ष नसे. लक्ष असे तें अमूक एक नट अमुक गाणें कसें म्हणतो याकडे. यामुळें पूर्वीं होऊन गेलेल्या अनेक गायक नटांनीं संगीताच्या जोरावरच आपलें नांव केलें हें दिसून येईल. महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या गद्य कंपन्यांत मात्र संगीताची उणीव भरून काढण्यासाठीं अभिनयादि इतर गोष्टींकडे जास्त लक्ष द्यावें लागे. पण त्यावेळचीं नाटकें पाहिलेल्या प्रेक्षकांना, त्यावेळचे गद्य नट आवाज ‘ लावण्या ’ची कसरतच जास्त करीत असत हें आठवत असेल. त्यामुळें ‘ नाटक बसवणें ’ या बाबतीं-तील या गद्य नाट्यसंस्थांची व्याख्याही परिपूर्ण नव्हती.

जेव्हां सामाजिक नाटकांचा जमाना सुरू झाला—विशेषतः विदेशी नाटकांची छाप आपल्या नाटककारांच्या नाटकांवर—आणि त्यांतही, संवादपद्धतीवर पडूं लागली, तेव्हांच ‘ नाटक बसवण्या ’च्या आणखी कांहीं क्लृप्त्या आहेत, हें उपलब्ध झालें; व पूर्वीं रंगभूमीवर आलेलीं पात्रें खिळे ठोकलेल्या येशु ख्रिस्ता-प्रमाणें एकाच जागीं खिळून उभीं राहात, तीं आतां ह्या नवीन पद्धतीच्या नाटकांतून रंगभूमीवर मोकळेपणानें वावरूं लागलीं. त्यामुळें रंगभूमीवर जास्त जिवंतपणा आला. नाटककरानें जें प्रत्यक्ष लिहिलेलें नाहीं, तें रंगभूमीवर दिसून येऊन प्रयोगांत जास्त जिवंतपणा दिसूं लागला, त्यांत सजीवता आली. पात्रांची ऊठ—बस, दोन पात्रें बोलतांना त्यांच्या संवादांतील आशयाप्रमाणें त्यांची होणारी हालचाल, इतर पात्रें तेथें असल्यास त्यांच्यावर होणारे परिणाम हें सर्व पाहातांना प्रेक्षकांना त्या पात्रांबद्दल आत्मीयता वाटूं लागली. पूर्वीं पात्रें बोलतांना क्वचितच एकमेकांकडे पाहात.

प्रेक्षकांसमोर तोंड करून जणूं काय त्यांनाच उद्देशून तीं बोलत. अलिकडच्या नाटकांत जास्त स्वाभाविकता आली. ह्या स्वाभाविकतेचा तुच्छतापूर्वक उल्लेख करणारीं श्री. गोविंदराव टेंबे यांच्यासारखीं कांहीं जुनीं खोडें आजही दिसून येतात. परंतु, श्री. टेंबे यांचीं मतें किती बुरसलेलीं आहेत, हें त्यांच्याशीं नाट्याबद्दल दहा मिनिटें बातचीत केली, तर सहज दिसून येतें. नाटक हें कृत्रिमच असलें पाहिजे, हीच या जुनाट लोकांची कल्पना. त्यामुळें, आजकालच्या सामाजिक नाटकांत येणाऱ्या सामाजिक समस्याही त्यांना नाट्याला पोषक वाटत नाहींत. परंतु, आतां जो हा नवीन नाट्यप्रकार रंगभूमीवर निर्माण झाला आहे, त्यांत पिछेहाट होण्याचा सुतराम् संभव नाहीं. नाटक हें रंगभूमीवरील केवळ करमणुकीचें साधन नसून त्याचा जीवनाशीं आतां घनिष्ट संबंध जडला आहे. नाटकांतून जीवन प्रकट करण्याचा आधुनिक नाटककारांचा उद्देश सफल होत चालला आहे. अशा वेळींच हीं नाटकें लोकांसमोर जास्त स्वाभाविक स्वरूपांत ठेवणें, ही नाट्य–दिग्दर्शकावरील जबाबदारी वाढली आहे. मूळ नाटकांतील जिवंतपणा तितक्याच–किंबहुना कंकणभर जास्त–जिवंत स्वरूपांत प्रेक्षकांसमोर मांडण्याची त्याच्यांत कुवत पाहिजे. ही कुवत अंगीं येण्यासाठीं नित्य नवीं नवीं नाटकें बसवण्याचे त्यानें प्रयत्न केले पाहिजेत–चांगलीं बसवलेलीं इतरांचीं नाटकें लक्षपूर्वक पाहिलीं पाहिजेत. नाटककार नाटकांत प्रत्येक बारीक सारीक गोष्ट लिहीत नसतो. ती दिग्दर्शकानें कौशल्यानें टिपून घेतली पाहिजे. त्याचा आशय आपल्या दिग्दर्शन कौशल्यानें प्रेक्षकांना दाखवला पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे नाटककारानें आपला जीव ओतून तयार केलेल्या बाहुलीस सुंदर वस्त्रालंकारांनीं नटवून प्रेक्षकांपुढें तिला ठेवली पाहिजे.

या बाबतींत ‘ नाट्यनिकेतन ’ च्या नाट्यप्रयोगांची नेहमींच

प्रशंसा होते. हीं नाटकें कशीं बसवलीं जातात, हें पाहाण्याची अनेक प्रेक्षकांना उत्कंठा असते. ती जरी पूर्ण करतां आली नाहीं, तरी त्यांना या एकांकिकेच्या शेवटीं दिलेल्या ठोकळ सूचनांवरून त्याची थोडीफार कल्पना येईल. विशेषतः, नाटकें बसवूं पाहाणाऱ्या ॲमेच्युअर नाट्यसंस्थांना त्यामुळें थोडेंफार मार्गदर्शन होईल. नोटेशनचीं पुस्तकें वाचून जसें गातां येणार नाहीं, तसेंच ह्या दिग्दर्शनाच्या सूचना वाचून नाटक बसवतां येईल असेंही नाहीं. परंतु, ज्याला थोडीफार नाट्यदृष्टि आहे, त्याला मात्र त्यांतून कांहीं कल्पनांचा पुरवठा होईल. नाटक कसें बसवावें, याची साधारण तरी कल्पना यावी, म्हणून प्रथम कांहीं एकांकिकाच दिग्दर्शनाच्या सूचनांसह प्रसिद्ध करण्यांत येणार आहेत. व हा प्रयत्न यशस्वी झाल्यास नंतर मोठीं संपूर्ण नाटकें प्रसिद्ध करण्याचा मानस आहे या परिश्रमांचा कांहीं उपयोग झाला, तर लेखकाला श्रमपरिहाराचें समाधान लाभेल.

मॉडेल हाऊस
प्रॉक्टर रोड,
मुंबई नं. ४

**मो. ग. रांगणेकर**

# प्रयोगाची पूर्व तयारी

" फरारी " ही एकांकिका करण्यास तीस मिनिटें लागतील. संगीत केल्यास आणखी पांच सात मिनिटें लागतील. या एकांकिकेंत फक्त पांच पात्रें आहेत. त्याचें स्वरूप व वेषभूषा पुढीलप्रमाणें :—

**आबा** : पन्नाशी ओलांडलेला एक आंधळा म्हातारा, थट्टेखोर वृत्तीचा, आनंदी; एक सदरा, धोतर व हातांत काठी.

**सुनंदा** : वीस बावीस वर्षांची विवाहित तरुणी, मध्यम बांधा, मानेवर केसाचें चाक, ब्लाऊज, विकच्छ साडी, वृत्तीनें आनंदी, दोन्ही हातांत सोन्याच्या बांगड्या.

**द्वारकानाथ** : पंचवीस वर्षांचा तरुण, उमद्या स्वभावाचा, चेष्टेखोर, सुटसुटीत बांधा, धोतराचा काचा व शर्ट, केसांचा भांग पाडलेला.

**शारदा** : सुनंदाच्याच वयाची तरुणी, कपडे भडक, आढ्यताखोर, स्वतःला बंडखोर लेखिका समजणारी, पाठीवर शेपटा, डाव्या मनगटांत रिस्टवॉच, उजव्या हातांत बांगड्या, गळ्यांत फक्त एक सोन्याची सांखळी.

**गजानन** : द्वारकानाथापेक्षां थोडा मोठा, चेहरा चिंतायुक्त, डोळे भेदक, प्रथम वेष पारशी फॅशनचा, नंतर मुसलमानी टोपी, बंद गळ्याचा कोट, पायजमा वगैरे, वाणी गंभीर.

## दिवाणखान्याची रचना

डाव्या हाताला माडीवर जाण्याचा जिना, समोर डाव्या बाजूला स्वयंपाकखोलींत जाण्याचा दरवाजा, उजव्या हाताला शेवटीं बाहेरून येण्याचा दरवाजा, उजव्या हाताला अलिकडे खिडकी, खिडकीखालीं दोन प्रशस्त खुर्च्या व एक टिपॉय, स्टेजच्या मध्य-भागीं एक राउंड टेबल व त्यावर फुलें घालून ठेवलेलें मोठें फ्लॉवर पॉट, 'फूटलाईट' जवळ डाव्या बाजूस एक रॉकिंग चेअर व त्याच्या बाजूस एक लहानशी बैठी बैठक, भिंतीला सुंदर तसबिरी, दारांना शोभिवंत जाळीचे पडदे लावलेले, डाव्या बाजूस भिंतीला टेंकून ठेवलेला पुस्तकांचा स्टँड व त्याच्या बाजूस रायटिंग टेबल, खुर्ची.

## प्रयोगासाठीं लागणाऱ्या किरकोळ वस्तु

एक मराठी वर्तमानपत्र, पानाचें साहित्य असलेली चंची, कांहीं मराठी पुस्तकें, रायटिंग टेबलावरील सामान, विमाएजंटाला शोभणारें चामड्याचें पाकिट, काठी, चहाचा कप, छोटी हँडबॅग.



# फ रा री

[ एक प्रशस्त दिवाणखाना. समोर बाहेरून येण्याचा दरवाजा असून डाव्या बाजूला माडीवर जाण्याचा जिना व त्याच्या डाव्या बाजूस माजघराकडे जाण्याचा दरवाजा आहे. दारावर सुंदर पडदे सोडले असून दिवाणखानाही सुंदर फर्निचरनें सुशोभित केला आहे. पडदा उघडतो, त्यावेळीं आबा एका रॉकिंग खुर्चीवर बसले असून त्यांची सून सुनंदा त्यांना ताज्या वर्तमानपत्रांतील बातम्या वाचून दाखवीत आहे. आबा, अर्थातच, आंधळे आहेत. ]

**सुनंदा :** ( वाचते ) "तीन डोळ्यांचें विचित्र मूल. सावंतवाडी संस्थानांतील माजगांव येथें एक विचित्र मूल जन्मलें आहे. त्याच्या सर्वांगावर केस असून त्याला तीन डोळे आहेत. हें विचित्र मूल पाहाण्यासाठीं संस्थानांतील ठिकठिकाणाहून लोकांची गर्दी लोटत आहे. हें मूल जन्मतःच मरण पावले."

**आबा :** मरायचंच. नाहीं तर तिथले लोक त्या संपादकाला येऊन भेटले असते आणि त्याला म्हणाले असते, कुठल्या घरांत हें मूल जन्माला आलं तें दाखव. –हो, म्हणजे आली पंचाईत ! (हंसतात) –हं, पुढं वाच.

**सुनंदा :** "दिल्लींत खळबळ."

**आबा :** कां ग ! व्हॉइसरॉयचं ब्लड प्रेशर वाढलं कीं काय ?

**सुनंदा :** छेः, दिल्लीजवळ एका खेड्यांत एका मुलीला स्वप्नांत आपल्या पूर्वजन्माची आठवण झाली—

**आबा :** ( मध्येंच ) आणि ती सकाळीं उठून एका घरीं गेली — तिथं तिला तिचा पूर्वजन्मींचा नवरा भेटला—असंच कीं नाहीं ? —पुरे आतां असल्या बातम्या. त्या गांधींची कांहीं बातमी आहे का पाहा.

**सुनंदा :** हो–( वाचते ) "आज संध्याकाळीं प्रार्थना आटोपल्यावर एक बाई उठली आणि म्हणाली, 'महात्माजी, काळा बाजार करून गब्बर झालेल्या श्रीमंताच्या घरावर दरोडे घालून फरारी झालेल्या एका टोळीला पकडण्यासाठीं सरकारनं बक्षिस जाहीर केलं आहे, तरी त्यांच्यापैकीं कोणी सांपडल्यास त्याला पोलिसाच्या हवालीं करणं योग्य होईल काय ?' महात्माजींनीं आपलं जगप्रसिद्ध स्मित केलं आणि ते म्हणाले, 'अर्थातच. तुमचा नवरा त्यांत असला, तरी त्याला पकडून पोलीसच्या हवालीं करा. गुन्ह्याचं पारिपत्य करणं आणि जनतेचं रक्षण करणं हें सरकारचं काम आहे."

**आबा :** त्या गांधीचं आपलं नेहमीं जगावेगळं कांहीं तरी असतं ! म्हणे, 'तुमचा नवरा असला तरी त्याला पोलिसच्या हवालीं करा.' कुठली स्त्री ही गोष्ट करायला तयार होईल ?

**सुनंदा :** शिस्त राहावी म्हणून म्हणाले असतील ते.

**आबा :** अग चल. मला भेटायला हवा तो गांधी एकदां !

**सुनंदा :** पण त्यांना पाहातांच 'मी मी' म्हणणाऱ्याची देखील जीभ लुळी पडते म्हणतात !

**आबा :** मला नाहीं ती भीति ! माझ्यापुढे गांधी उभा आहे कीं चर्चिल उभा आहे–मला थोडाच दिसणार आहे ! डोळे असतील त्यांना वचक गांधीचा. मला काय त्याचं ?

**सुनंदा :** हो—आंधळं असण्यापासून इतर तोटे असले, तरी हा मात्र फायदा आहे खरा!

**आबा :** अग, आणखीही खूप फायदे आहेत आंधळेपणाचे; पण ते दिसताहेत कुठं तुम्हांला?

**सुनंदा :** आंधळेपणाचे फायदे?

**आबा :** तर! पण ते तुम्हां डोळसांना थोडेच कळणार आहेत! त्याला आंधळं व्हावं लागतं आंधळं! तुमच्या डोळ्यापुढून दिवसभर हजार गोष्टी जायच्या. विचार करायला वेळ आहे कुठें तुम्हांला? ऊन आलं, खिडक्या लाव.–काळोख पडला, दिवा लाव.–चोर येईल म्हणून दरवाजा बंद कर.–भूत दिसेल म्हणून डोकीवर पांघरूण घे.–आमच्या राज्यांत आहे हें? कुणी या, कुणी जा–आम्ही निश्चिंत! डोळ्यापुढं फक्त एक अंधार! पण त्या अंधारांत आम्हां आंधळ्यांना जें दिसतं, तें तुम्हांला खखखीत उजेडांत दिसायचं नाहीं, समजलीस!–जाऊं दे, तो पाहुणा गेला कीं आहे अजून?

**सुनंदा :** आजच जाणार आहे.

**आबा :** आणि द्वारकानाथ ऑफिसांत गेला नाहीं वाटतं?

**सुनंदा :** अंहं, पाहुणे जाणार आहेत म्हणून राहिले आहेत ते.

**आबा :** ( थोड्या वेळानें ) काय ग, कसा काय माणूस वाटला तुला?

**सुनंदा :** कोण?

**आबा :** तो पाहुणा आला आहे तो! परवा मी त्याच्या गोष्टीला बसलों होतो–त्यावरून मी त्याचं चित्र रेखाटलंय माझ्या मनाशीं! तो कांहीं असातसा माणूस दिसत नाहीं.

**सुनंदा :** म्हणजे?

**आबा :** अग, पहिली गोष्ट म्हणजे तो पारशी नाहीं.

**सुनंदा :** छेः–पारशीच आहेत ते.

**आबा :** तुला बनवलं असेल तुझ्या नवऱ्यानं.

**सुनंदा :** पण त्याचं नाक लांब आहे.

**आबा :** माझंही आहे, म्हणून मी पारशी आहे होय ? दाढी वाढविली कीं शीख झाला, आणि पगडी घातली कीं पुढारी झाला—हें राहिलं नाहीं आज काल ! काय ग, तो पारशी आहे, तर पान कसा काय खातो ग ?

**सुनंदा :** छेः – कधींच खात नाहींत.

**आबा :** (वेडावून) छेः, कधींच खात नाहींत ! तूं नव्हतीस त्या दिवशीं घरीं; गप्पा मारतां मारतां मी चंची पुढं केली त्याच्या—

**सुनंदा :** आणि त्यांनीं पान खाल्लं ?

**आबा :** तर ! तेव्हांच ओळखलं मी, कीं ही स्वारी दिसायलाच काय ती पारशी, – बाकी सारं काम सोळा आणे हिंदु आहे ! मग तो सावरून घ्यायला लागला, कीं पुण्याला कॉलेजांत चार वर्षं होता तेव्हां कधींकधीं द्वारकानाथाबरोबर पान खायचा. पण आम्ही ओळखायचं तें ओळखलं ! म्हटलं गुलामा, आंधळा आहे मी – मला काय फसवशील तूं ? डोळस माणसांना फसव म्हणावं पारशी कपडे घालून आणि तपकीर ओढून. हा आबा नाहीं फसायचा ! (हंसतात)

**सुनंदा :** पण त्यांना पारशी कपडे घालायचं काय कारण ?

**आबा :** अंगावर खादीचे कपडे नाहीं चढवीत कांहीं कांहीं डांबीस माणसं ? तीं काय सारींच देशभक्त असतात ? त्यांतलाच हा प्रकार. असेल त्याचा कांहींतरी डाव !

**सुनंदा :** पण खादीच्या बुरख्याखालीं निदान कसला तरी काळाबाजार तरी करतां येतो. पारशी कपडे घालून तसं कांहीं साधतां येत असेल, असं नाहीं मला वाटत !

**आबा :** पोलीसानां चकवतां येत असेल.

**सुनंदा :** ( चमकून ) म्हणजे ?

**आबा :** अग पोरी, अगदींच डोळस कशी ग तूं ? थोडी आंधळी हो आंधळी ! आणि मग पाहा, सभोवतीं केवढं दिसायला लागेल तुला ?

[ असें म्हणत हंसत हंसत जातात. सुनंदा त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहात स्वतःशींच विचार करीत गाते. ]

**सुनंदा :—** **म्हणती कां अंध या जना ।**
**बघती जोंवरी शून्य लोचनीं ।**
**दिसत न जें बहुजना ॥ ध्रु० ॥**
**जरी मुकलें सुख जीवनीं सारें ।**
**खंत न वाटे हृदया ।**
**नकळे मनिंची काय भावना ॥ १ ॥**

**सुनंदा :** ( जिन्यावरून सिगारेट पेटवीत द्वारकानाथास येतांना पाहून ) काय हो साहेब, तुमचे पारशी पाहुणे आले नाहींत अजून ?

**द्वारका० :** हं—तुमच्याही हिंदु पाहुण्या आल्या नाहींत अजून ?

**सुनंदा :** ( हातांतल्या घड्याळाकडे पाहून ) येईल एवढ्यांत. गाडी आली असेल.

**द्वारका० :** ठीक, एक पाहुणा जातो आहे—दुसरा येतो आहे. सरदारगृहाची शाखा उघडायला हरकत नाहीं आपल्याला !

**सुनंदा :** सरदारगृहांत पारशांना उतरायला देतात ?

**द्वारका० :** उंः—आजकाल कुठला पारशी न् मुसल्मान ओळखतां येतो आहे ! आमच्या कॉलेजामधलीं कांहीं मुलं मागें पंढरपुरला गेलीं होतीं—तेव्हां शेख नांवाचा एक मुसलमान मुलगा खुशाल विठोबाला भेटून आला होता !

**सुनंदा :** हो, खरंच. नुसत्या कपड्यावर आणि दाढी-मिशांवर जात अवलंबून राहिली नाहीं आजकाल. हा तुमचा पारशी पाहुणा खराच पारशी आहे ना?

**द्वारका० :** सोराब कापडिया होय? ( हंसतो )

**सुनंदा :** तो सोराब आहे कीं रुस्तुम आहे—कीं दोन्ही नाहीं—

**द्वारका० :** म्हणजे?

**सुनंदा :** नाहीं—कपड्यावरून हल्लीं कांहीं जातपात कळायची सोय नाहीं. असायचा एखादा भागवत नाहींतर दामले!

**द्वारका० :** हट्—आबादेखील नाहीं फसायचे!

**सुनंदा :** हो, आबा देखील नाहीं फसायचे!

**द्वारका० :** ( टेबलावरील एक दोन पुस्तकें चाळीत ) हीं पुस्तकं मुद्दामच कपाटांतून बाहेर काढून ठेवलीं आहेस वाटतं आज?

**सुनंदा :** हो, शारदा यायची आहे ना! तिच्या पुस्तकांखेरीज मी अलीकडे दुसरं कांहींच वाचत नाहीं, असं दाखवायला हवं तिला.

**द्वारका० :** सारा बनवाबनवीचा प्रकार!

**सुनंदा :** हो, अलीकडे पाहावं तिथं बनवाबनवी चालली आहे. म्हटलं आपणही हात धुवून घ्यावा!

**द्वारका० :** ( हंसत ) अस्सं! काय भयंकर कादंबरी लिहिली आहे ग तिनं! हंः! बाईमाणूस असून असं उघड उघड पाचकळ लिहायची तिला कशी काय छाती झाली कळत नाहीं.

**सुनंदा :** पुरुषांनीं लिहिलं तर चालतं वाटतं?

**द्वारका० :** अग, पुरुष बोलून चालून निर्लज्ज. पण बायका म्हणजे मर्यादशील, विनयशील—

**सुनंदा :** तुम्हां पुरुषांनींच विशेषणं बहाल केलीं आहेत हीं बायकांना. अहो साहेब, चार बायका रंगांत आल्या म्हणजे आपापसांत ज्या गोष्टी एकमेकाला सांगतात, त्या ऐकायला देखील तुमची छाती व्हायची नाहीं!

**द्वारका०** : काय म्हणतेस ?

**सुनंदा** : पण तुम्हाला तें कळणार कसं म्हणा ! पुरुषापुढें कोण बोलायला बसलं आहे त्या गोष्टी !

**द्वारका०** : असेल असेल—ही कादंबरी वाचतांना थोडीशी चुणूक कळली मला !—काय ग, तुझ्या ह्या मैत्रिणीचं लग्न झालं नाहीं वाटतं ?

**सुनंदा** : कशावरून ?

**द्वारका०** : अगदीं भुकेल्यासारखी दिसते आहे !

**सुनंदा** : लग्न होऊन न झाल्यासारखं झालं आहे तिचं.

**द्वारका०** : म्हणजे ?

**सुनंदा** : तिनं नवऱ्याला सोडलंय.

**द्वारका०** : मूलबाळ ?

**सुनंदा** : अंहं.

**द्वारका०** : तरीच !

**सुनंदा** : तशी कांहीं ती वाईट मुलगी नाहीं. पण नवऱ्याशीं पटलं नाहीं तिचं एवढं खरं.

**द्वारका०** : नंतर कुणाशीं पटवून नाहीं वाटतं घेतलं ?

**सुनंदा** : अजून तरी नाहीं.

**द्वारका०** : संभाळलं पाहिजे ती आल्यावर !

**सुनंदा** : तुम्हांला ? हंः—लग्न झालं आहे तुमचं !

**द्वारका०** : काय नेम ! लग्न झालेलाच पुरुष आवडतो कांहीं कांहीं बायकांना !

**सुनंदा** : तुमचा हा कापडीया कीं धोतरीया लग्नावांचून राहिला आहे वाटतं अजून ?

**द्वारका०** : कां ? तसं म्हणाला तो ?

**सुनंदा** : छेः—तसं कांहीं म्हणाला नाहीं. पण मी त्याच्याशीं

बोलत बसलें होतें, तेव्हां त्याच्या बायकोची चौकशी केली मी. तेव्हां तो नुसता हंसला आणि तपकिरीची चिमूट नाकांत भरली.

**द्वारका०** : पारशांत लवकर लग्नं होत नाहींत आपल्यासारखीं! चाळीशी उलटली, कीं त्यांना लग्नाची आठवण होते.

**सुनंदा** : हाही अजून पारशीच राहिला वाटतं?

**द्वारका०** : म्हणजे?

**सुनंदा** : छेः—तुमचा मित्र आहे म्हणून म्हणतें. सिगरेट देखील ओढीत नाहीं?

**द्वारका०** : छेः, फक्त तपकीर.

**सुनंदा** : पक्का पारशी दिसतो!

**द्वारका०** : तर!

**सुनंदा** : हल्लींच्या युगांत जात टिकवायची म्हणजे अवघडच! कांहीं कांहीं ब्राह्मणदेखील अंडीं खातात म्हणे!

**द्वारका०** : अंडींच?—हंः—त्याच्याही पुढं!

**सुनंदा** : आणि हा आपला पारशी एके पारशीच राहिला आहे अजून.

**द्वारका०** : हो.

**सुनंदा** : तुम्ही दीक्षा दिली नाहीं वाटतं अजून?

**द्वारका०** : आम्ही खूप देऊं, त्यानं ऐकलं पाहिजे ना?

**सुनंदा** : कुठं गेली आहे स्वारी इतका वेळ?

**द्वारका०** : त्याच्या विम्याच्या कामासाठींच कुणाला भेटायला गेला आहे पण एवढ्यांत यायला हवा तो. गाडीची वेळ होत आली आहे त्याची. ( आवाज ऐकून ) आला वाटतं?

[ हातांत लहानशी बॅग घेऊन शारदा येते. ]

**सुनंदा** : अय्या, शारदा!—आलीस? आणि हें काय? सामान नाहीं वाटतं कांहीं तुझ्याबरोबर?

**शारदा :** अग, मी का राहायला आलें आहें ? अशीच पुढं बडोद्याला जाणार आहे संमेलनाला. सामान देखील गेलं माझं पुढं. म्हटलं एक दिवस तुझ्याकडे राहून पुढें जावं.—हे तुझे मिस्टर वाटतं ?

**द्वारका० :** ( नमस्कार करीत ) हो.

**शारदा :** चांगली आहे बाई जागा तुझी.

**सुनंदा :** मग राहा ना चार दिवस.

**शारदा :** अय्या—संमेलनाला जायला आले आहे मी. येतांना राहीन चार दिवस पण उद्यां मला जायलाच हवं बाई. ( पुस्तकांकडे लक्ष जाऊन ) ॲहं—जशीं कांहीं माझींच पुस्तकं वाचीत असतेस रोज !

**सुनंदा :** विचार यांना.

**द्वारका० :** हो—हल्लीं घरांतल्या संसाराकडे देखील लक्ष नाहीं तिचं. सारखं हातांत तुमचं पुस्तक आणि काम करतांना तोंडांत तुमच्याच कविता.

**शारदा :** हो का ग ? म्हणून तरी दाखव एखादी.

**सुनंदा :** छेः ग, उगीच यांचं कांहींतरी !

**द्वारका० :** तुम्ही नाहीं वाटतं तुमच्या कविता गात ?

**शारदा :** छेः-गळा असला तर गायच्या ना !

**द्वारका० :** तेही खरंच ! गातां येत असलं, म्हणजे त्या जोरावर कसल्याही कविता खपवितां येतात.

**शारदा :** आमच्यांत आहेत ना असले कवि नि कवयित्री.

**द्वारका० :** ( सुनंदाकडे डोळे मिचकावून ) बाकी तुमची कादंबरी आम्हांला खूप आवडली.

**सुनंदा :** ( त्याची चेष्टा टाळण्यासाठीं ) चल—तोंडबिंड तरी धुवून घे.

**शारदा :** अग थाब ग—( द्वारकानाथास ) खरंच !

**द्वारका०** : विचार हिलाच. अगदीं स्पष्ट आणि मोकळ्या भाषेंत लिहिलं आहे तुम्ही. कसला आडपडदा नाहीं कीं कांहीं नाहीं.

**शारदा** : मला रागच आहे खोटं खोटं लिहिण्याचा.सारं कृत्रिम! मनांत येतं तें उघडउघड लिहिलं पाहिजे. तरच तें जिवंत वाङ्मय.

**द्वारका०** : अशीं दहापांच पुस्तकें निघालीं तर क्रांति होईल समाजांत !

**शारदा** : लिहिणारच आहे मी. कुणी कुणी टीका केली आहे–

**द्वारका०** : तुमच्या पुस्तकावर ?

**शारदा** : हो, – म्हणे, लेखिकेनं मर्यादा सोडली आहे–लेखिका कसल्यातरी अतृप्त भावनेसाठीं हपापलेली आहे – एक ना दोन काय वाटेल ती टीका करताहेत लोक माझ्यावर–

**द्वारका०** : पण तुम्ही त्याची मुळींच पर्वा करूं नका.

**शारदा** : छेः—उलट मला जास्तच हुरूप आला आहे. महाराष्ट्र साहित्यांत एक नवीन दालन उघडल्याचं तरी श्रेय मिळेल मला. टीका होत नाहीं कुणावर ?

**द्वारका०** : हो टिळकांचं गीतारहस्य देखील सुटलं नाहीं टीकाकारांच्या तडाख्यांतून !

**शारदा** : कला म्हणजे कला! तिथं कसलीं बंधनं आणि कसल्या मर्यादा? मनांत उसळतं तें लिहायचं नाहीं, तर लिहायचं कशाला?

**द्वारका०** : अलबत. आतां हीच तुमची कादंबरी. त्यांतली नायिका लग्न होत नाहीं म्हणून इतकी तळमळते आहे—आतां या कुमारिकेच्या अंतःकरणांतील नैसर्गिक भावना – तरुण पुरुष पाहिला कीं तिला कसंसंच होतं—अगदीं नॅचरल!

**शारदा** : आतां या भावना आहेत तशा रंगवायच्या नाहींत, तर त्या ‘ कॅरेक्टर ’मध्यें जिवंतपणा येणार कसा ?

**द्वारका०** : अगदीं बरोबर.

**सुनंदा :** ( त्यांच्या चेष्टेतून तिला सोडविण्यासाठीं ) तुला कपडे बदलायचे नाहींत का ? प्रवासाहून आली आहेस तूं—

**शारदा :** अग, माझं सारं कांहीं गाडींत झालं आहे. चहा मात्र घेणार आहे थोडा.

**सुनंदा :** मग चल. तो तरी घे थोडा. आल्यापासून सारखं वाङ्मय बडबडते आहेस; दुसरा कांहीं विषय आहे कीं नाहीं बायकांना ?

**शारदा :** हो हो—किती मुलं झालीं तुला ? बटाटे कसे शेर मिळतात ? —आणि पगार काय मिळतो तुझ्या मिस्टरना ?

[ सुनंदा जातां जातां तिच्या पाठीवर चापट मारते. दोघी हसंत हसंत आंत जातात. द्वारकानाथ स्वतःशींच हंसून गाणें म्हणतो. गाणें संपण्याच्या सुमारास सोराब खाकेत एक पातळशी कपड्याची बॅग घेऊन येतो. ]

**द्वारकानाथ :** **सोडिती विनया । जरि या ललना ।**
**काय मोल ऐशा जीवना ॥ ध्रु० ॥**
**बघुनि अधोमुख सुंदर ललना ।**
**निर्मिती हृदयीं रुचिर भावना ।**
**अलंकार हा खचित स्त्रीजना ॥ १ ॥**

**द्वारका० :** केम बाबा—आव्या के तमे ?

**सोराब :** हां दिकरा. बद्धा काम खलास करीने आव्या.
( दोघेही हंसतात. )

**द्वारका० :** अगदीं नखशिखांत पारशी झाला आहेस तूं, गजा.

**गजा० :** आतां मुसलमान होऊन बाहेर पडणार आहे.

**द्वारका० :** म्हणजे ?

**गजा०** : तसाच प्रसंग आला आहे.

**द्वारका०** : कुणी ओळखलं ?

**गजा०** : हं. 'बस' मधें मला शंका आली, म्हणून मी उतरून ट्रॅममधें चढलों. तिथंही तो माझ्यामागें दिसला. म्हणून चालत निघालों. तरीही तो मागें मागें आहेच. म्हणून एक टॅक्सी घेतली आणि वाळकेश्वर गांठलं आणि तिथं ती टॅक्सी बदलून दुसरी घेतली आणि इथं आलों. म्हटलं आतां सोराब कापडियाचा अवतार संपवून रहेमान काजी होऊन बाहेर पडावं. आज इथून सुटलों म्हणजे देतो गुंगारा.

**द्वारका०** : तुझ्या पार्टीचे आणखी कोणी भेटले ?

**गजा०** : हो, दोघे मद्रासहून आले आजच. सारेजण जाणार आम्हीं आतां कलकत्त्याला.

**द्वारका०** : बरं बरं—आटप, चल. तुझं जेवण तयार आहे वर. गाडीची वेळ होईल.

**गजा०** : (खुर्चीवर पडलेली बॅग पाहून) कुणी आलं आहे वाटतं ?

**द्वारका०** : हं. सुनंदाची मैत्रिण आली आहे पुण्याहून.

**गजा०** : बाईच आहे ना ? मग हरकत नाहीं.

**द्वारका०** : निघायची एखादवेळ ओळखीची !

**गजा०** : पार्टीतल्या बायकांखेरीज ओळखी ठेवल्या नाहींत मी कुणाशीं.

[ जिन्यावरून जातो. त्याच वेळीं सुनंदा आणि शारदा येतात. शारदा चहाचा घोट घेत घेत येते. ]

**शारदा** : ( गजाननाच्या पाठमोऱ्या आकृतीकडे लक्ष जाऊन ) कुणी पाहुणा आला आहे वाटतं ?

**सुनंदा** : हं, यांचा मित्र आला आहे कॉलेजांतला. ( थोड्या वेळानें ) तूं विमा उतरला आहेस का ?

**शारदा :** म्हणजे विमा एजंट आहेत वाटतं ?

**द्वारका० :** तुम्हांला घाबरण्याचं कारण कारण नाहीं. आतांच जाणार आहे तो.

**शारदा :** मग हरकत नाहीं.

**सुनंदा :** तूं विम्यावर नाहीं वाटतं एखादी कविता केलीस ?

**शारदा :** हट्. विमा हा कवितेचा विषय वाटतं ? उद्यां घटस्फोटावर कविता करायला सांगशील ?

**द्वारका० :** म्हणजे तुम्हीं अजून केली नाहीं ? वास्तविक तुम्हीं खंडकाव्य करायला हवं त्या विषयावर !

**शारदा :** कां ?

**द्वारका० :** नाहीं म्हणजे—तुम्ही—ही कायसंसं म्हणत होती—कीं तुम्हीं—

**शारदा :** काय म्हणायचं आहे तुम्हांला ? अगदीं सरळ विचारा. मला स्पष्टपणा आवडतो.

**द्वारका० :** हो, ते मला तुमच्या पुस्तकांवरून दिसून आलं, म्हणूनच विचारायचा धीर करतों आहे.

**शारदा :** येऊन जाऊन काय विचारणार तुम्हीं ? तुम्हीं नवऱ्याला सोडून कां गेलांत ? ऐका. माझं ज्या माणसाशीं लग्न झालं—नांव नाहीं घेत मी त्याचं

**द्वारका० :** नाहीं तरी बायको नवऱ्याचं नांव नाहींच घेत आपल्याकडे !

**शारदा :** त्या भावनेनं नांव घेत नाहीं, असं समजूं नका. पण मला त्यांचं नांवदेखील घेऊं नयेसं वाटतं.

**सुनंदा :** इतका तिटकारा आला तुला त्यांचा ?

**शारदा :** तुलाही आला असता. कारण बायकोला देखील मन आहे, स्वतंत्र विचारशक्ति आहे, आपलींच मतं तिच्यावर लादण्यांत अर्थ नाहीं—हें त्यांच्या गांवींही नव्हतं. मला संसार

करायचा होता, आणि त्यांना राजकारण करायचं होतं. सदा आपले त्यांतच गुरफटलेले. घरांत बायको आहे, संसार आहे, कशाकशाची जाणीव नव्हती त्यांना. आणि वर पुन्हां मला म्हणायचे, आमच्या पार्टींत ये. यांची पार्टी म्हणजे काय, तर कुठं संप घडवून आणा, आगगाड्या बंद पाडा, सभा भरवा, आरडा-ओरड करा. आणि पार्टीच्या वर्तमानपत्राचे अंक खपवा! मलाही एक दिवस म्हणायला लागले, तूं नाक्यावर जाऊन अंक वीक. तेव्हां मात्र मला चीड आली त्यांची. मला घरांत संसार करायचा होता, मुलंबाळं हवीं होतीं, कौटुंबिक सुख भोगायचं होतं; आणि हे मला नाक्यावर पार्टीच्या वर्तमानपत्राचे अंक विकायला सांगत होते. मी त्यांना ताडकन् उलटून जबाब दिला आणि तश्शी एका वस्त्रानिशीं निघून आईकडे आलें.

**सुनंदा :** त्यानंतर तुझी—त्यांची गांठ पडलीच नाहीं वाटतं?

**शारदा :** कुठं पडणार? आणि आतां तर त्यांच्या पार्टींतल्या लोकाची धरपकड चालली आहे. असतील कुठं तरी तुरुंगांत खडी फोडीत!

**द्वारका० :** अस्सं. एकूण तुमच्या लेखनाचं हें उगमस्थान!

**शारदा :** अहो, मनाचा कोंडमारा कुठवर सहन करायचा? इतक्या दिवसाची सारी तळमळ, भावना, वेदना—सारं काहीं बाहेर पडतं आहे कवितांच्या आणि कादंबऱ्यांच्या रूपानं आतां.

**आबा :** ( आंतून येत ) कोण रे आलं आहे? तुझी मैत्रिण येणार होती, तीच बोलते आहे का ग सुनंदा?

**द्वारका० :** हो आबा. हे माझे वडील. ( शारदा नमस्कार करते )

**सुनंदा :** नमस्कार करते आहे आबा तुम्हांला.

**आबा :** हो का? सांगितलंस म्हणून कळलं. एकटीच आली आहेस कीं बरोबर कुणी आहे?

**सुनंदा :** एकटीच आली आहे.

**आबा :** कसा काय नवरा सोडतो तुम्हांला एकटं कळत नाहीं.– काय रे द्वारकानाथ, तुझा तो पारशी पाहुणा जाणार म्हणे आज?

**द्वारका० :** हो, आतांच निघणार जायला. कपडे बदलायला गेला आहे. ( माडीवर जातो )

**शारदा :** कोण ग हा पारशी?

**सुनंदा :** तुला सांगितलं नाहीं का, यांचा एक मित्र आला आहे म्हणून.

**शारदा :** तो विमा एजंट म्हणालीस तोच का?

**आबा :** हो, विमा उतरतो तो. तुझा उतरला नसलास तर घे उतरून. चांगला मराठी बोलतो, आपलंच ब्राम्हणी जेवण जेवतो, आणि पान-तंबाखूही खातो!

**शारदा :** पारशी आणि पान खातो?

**आबा :** असलाच बाटगा पारशी आहे तो! जाणार आहे म्हणे आज.

**शारदा :** कुठं?

**आबा :** जाणार असेल इराणांत! तिथं कुठलीं पानं खाणार कळत नाहीं! जातांना दे त्याला शंभर पानं बांधून, सुनंदा! (हंसतात)

**शारदा :** म्हणजे ही काय भानगड आहे?

**सुनंदा :** आबा म्हणतात, तो कांहीं खरा पारशी नाहीं. पारशाचा वेष घेऊन इथं आला आहे.

**शारदा :** कारण?

**आबा :** तें त्याला माहीत आणि द्वारकानाथला माहीत. आम्हांला सांगत नाहींत. नका सांगूं म्हणावं. परवा त्याला गप्पा–गोष्टींत गुंगवला आणि चंची पुढं केली. बेटा लागला पान खायला! झालं – आम्ही ओळखायचं ते ओळखलं. म्हटलं बेट्या, तूं डोळसांना फसवशील, आम्हां आंधळ्यांना रे कसा फसवणार?

**शारदा :** आणि एजंट आहे, हें तरी खरं का?

**आबा :** तेंही थोतांड दिसतं मला. विमा एजंट म्हटला म्हणजे सहसा कोणी त्याच्या वाटेला जात नाहीं — म्हणून त्यानं हें विम्याचं ढोंग केलं असेल. पक्का लुच्चा दिसतो !

**शारदा :** नुसता लुच्चाच आहे कीं आणखी —

**सुनंदा :** असेना कां कुणीही. आज जातो आहे तो.

**शारदा :** संभाळ ग बाई. कुठला तरी फरारी माणूस असायचा आणि भलतंच किटाळ यायचं.

**आबा :** तुझा नवरा काय करतो ?

**शारदा :** ते राजकारणांत पडले आहेत.

**आबा :** वाः वाः—म्हणजे पुढारीबिढारी आहे कीं काय ?

**शारदा :** त्यांच्या पक्षांत सारे पुढारीच आहेत; अनुयायी कुणीच नाहीं !

**आबा :** म्हणजे कॉंग्रेसमध्यें नाहीं वाटतं ?

**शारदा :** छे; कॉंग्रेसला विरोध करणारी पार्टी आहे त्यांची.

**आबा :** म्हणजे सध्यां धरपकड चालली आहे—

**शारदा :** हो हो.—त्याच पार्टींत आहेत ते.

**आबा :** मग आहे कुठं सध्यां तो ?

**शारदा :** कोण जाणे !

[ द्वारकानाथ आणि गजानन जिन्यावरून येतात. गजाननने शेरवानी व पायजमा घातला असून डोक्याला फेज घातली आहे. पायांत काळा शू आहे. शारदा त्याला पाहातांच चमकते. तोही क्षणभर चमकतो. ]

**आबा :** झाली का तयारी जायची ?

**द्वारका० :** हो आबा—( शारदेस ) एक्सक्यूज हं— हा माझा कॉलेजांतला एक जुना दोस्त आहे रहेमान काजी.

**आबा :** आं ? रहेमान काजी ? आणि तो सोराब कापडिया कुठं गेला रे ?

**द्वारका० :** ( गडबडून ) म्हणजे–तोच तो–पण आतां—

**आबा :** ( मधेंच ) मुसलमान झाला आहे–असंच कीं नाहीं ? चालायचंच, चालायचंच. सरडा नाहीं रंग बदलीत ?

**द्वारका० :** म्हणजे आबा...

**आबा :** आलं लक्षांत—अरे, आंधळा आहे मी. कांहीं सांगू नकोस मला जास्त. सांगायचं असेल तर तुझ्या बायकोला आणि तेची ती मैत्रिण आली आहे, तिला सांग.

**सुनंदा :** काय हो सोराब कापडिया, तुमचा एवढ्यांत रहेमान काजी कां झाला ?

**आबा :** आणि काजीचा पाद्री केव्हां होणार, तेंही विचारून ठेव. हो...म्हणजे माझी आंधळ्याची पंचाईत व्हायला नको !

( गजानन शारदाकडे पाहाण्याचें टाळूं लागतो )

**शारदा :** इथं टेलिफोन नाहीं वाटतं तुझ्याकडे ?

**सुनंदा :** छेः, कुठं करणार होतीस ?

**शारदा :** पोलीस स्टेशनवर.

**सुनंदा :** कशाला ?

**शारदा :** तुझ्या घरीं आलेल्या फरारी माणसाला पकडायला.

**सुनंदा :** म्हणजे शारदा—

**शारदा :** आबा आतां काय म्हणाले, तें ऐकलं नाहींस ? सोराब कापडियाचा एवढ्यांत रहेमान काजी झाला; आणि त्या काजीचा थोड्या वेळानं पाद्री होणार, हे भाकीत आबांनीं कशावरून केलं, तें कळलं नाहीं तुला ? काय हो मिस्टर, तुमच्या या पाहुण्याची खरी जात कोणती ?

**द्वारका०** : कोणतीही का असेना, तुमचा संबंध येत नाहीं त्यांच्याशीं.

**शारदा** : अस्सं ? वर्तमानपत्रं वाचीत नाहीं वाटतं तुम्हीं ? फरारी माणसाला पकडून दिलं तर सरकारांतून बक्षिस मिळेल.

**द्वारका०** : त्या बक्षिसावर जगण्याइतकी तुमची हलाखीची स्थिति झाली असेल–असं मला वाटलं नव्हतं. सुनंदा, असल्या मैत्रि-णीला आपल्या घरांत आश्रय देण्यापूर्वी तूं थोडा विचार केला असतास तर बरं झालं असतं.

**शारदा** : सुनंदा, हा माझाच एकटीचा अपमान नाहीं, तुझाही आहे.

**सुनंदा** : तुम्हीही तुमच्या मित्राला आश्रय देण्यापूर्वी याच गोष्टीचा विचार करायला हवा होता, असं नाहीं तुम्हांला वाटत ? पोलीसला कळलं तर त्यांच्याबरोबर आपल्यावरही नसतं किटाळ यायचं !

**द्वारका०** : पोलीसला कोण कळवतं आहे ? चल, जाऊं आपण.

**शारदा** : मी कळवल्यावांचून राहीन असं वाटतं तुम्हालां ?

**द्वारका०** : तुम्ही ? ( थोड्या नरमाईनें ) हें पहा, तुमचा नवरा त्या पार्टींत आहे म्हणून तुम्ही पार्टींतल्या साऱ्याच इसमांवर दांत धरण्यांत काय अर्थ ? या बिचाऱ्यानं तुमचा काय गुन्हा केला आहे ?

**शारदा** : माझा केला नसला तरी आपल्या बायकोचा खास गुन्हा केला आहे.

**द्वारका०** : कशावरून ?

**शारदा** : माझ्यावरून म्हणतें मी. तुमचे हे मित्र पोलीसाला चकवण्यासाठीं गांवोगांव वेष पालटून हिंडणार ! आणि यांच्या बायकोनं काय करायचं ? तिच्या संसाराला काडी कुणी लावली ? संसार करावा, मुलंबाळं व्हावीं, कुटुंबांत राहावं–असं तिला

वाटत नसेल ? तिच्या भावनांचा यांनीं कधीं विचार केला आहे ? तिचं आयुष्य बरबाद करण्याचा काय अधिकार यांना ?

**द्वारका०** : पण तो प्रश्न याच्या बाबतींत उद्भवतच नाहीं. याला बायकोच नाहीं.

**शारदा** : मेली ?

**द्वारका०** : हो.

**शारदा** : हो ? आणि ही समोर उभी आहे ती कोण ? बायकोचं भूत ?

**सुनंदा** :<br>**द्वारका०** : } —म्हणजे...शारदा—

**शारदा** : यांची मेलेली बायको आहे मी. आणि हा माझा जिवंत नवरा मला पोलिसाच्या स्वाधीन करायाचा आहे.

**द्वारका०** : पण—

**शारदा** : वर्तमानपत्रं वाचीत नाहीं वाटतं तुम्हीं ?

**आबा** : हो हो. आजच्च वर्तमानपत्रांत गांधींनीं कुणालासं उत्तर दिल्याचं प्रसिद्ध झालं आहे, कीं अशा फरारी माणसाला त्याच्या बायकोनं देखील पोलीसाच्या हवालीं करायला हरकत नाहीं.

**शारदा** : ऐकलंत ?

**द्वारका०** : गांधींचं हें उत्तर तुम्हांला पसंत पडलं ?

**शारदा** : निदान माझ्यापुरतं तरी मला पसंत आहे.

**गजा०** : ( पुढे येऊन ) मग दे मला पोलीसच्या ताब्यांत; माझी तयारी आहे. द्वारकानाथ, मी तुला आणि तुझ्या बायकोला थोडे दिवस कां होईना—त्रास दिला, याबद्दल मला क्षमा कर. ( शारदेस ) कृपा करून यांना मात्र माझ्यापासून त्रास पोंचणार नाहीं एवढं कर. चल.

**द्वारका०** : चला. नवरा बोलावतो आहे तुम्हांला. करा त्याला पोलिसाच्या स्वाधीन आणि मिळवा सरकारकडून बक्षीस ! टाईम्स-

मध्यें फोटो येईल तुमचा!—मला तोंड देखील पाहायची इच्छा नाहीं तुमचं. [ जिन्यावरून वर जातो. शारदा तशीच तटस्थ होऊन उभी राहते. सुनंदाला काय करावें कळेना ]

**शारदा :** तूं नाहीं गेलीस ?

**सुनंदा :** मी जावं, अशी इच्छा आहे तुझी ?

**शारदा :** छेः...माझं तोंड पाहाण्याची तुझ्या नवऱ्याला इच्छा नाहीं, तशी तुलाही व्हायला हवी.

**सुनंदा :** यांना पोलिसाच्या हवालीं केलंस, तर मात्र तसं वाटेल खरं.

**शारदा :** ओहो ! बराच पुळका आलेला दिसतो तुला यांचा ?

**सुनंदा :** आणि तुला नवरा असून येत नाहीं....

**शारदा :** हंः, नवरा ! नवऱ्याचं असं कोणतं कर्तव्य पार पाडलं यांनीं ?

**सुनंदा :** त्यांनीं आपलं कर्तव्य पार पाडलं नाहीं, आणि तूं त्यांना पोलिसाच्या स्वाधीन करून जणूं काय पत्नीचं कर्तव्य पार पाडीत असशील !

**गजा० :** पोलिसच्या स्वाधीन व्हायला मी भीत नाहीं. कधीं ना कधीं हा प्रसंग येणार, हे माहितच होतं आम्हां साऱ्यांना. पण साऱ्याच जणांना त्यांच्या बायका पोलीसाच्या हवालीं करणार नाहींत.

**सुनंदा :** त्या दृष्टीनं तुम्ही भाग्यवान म्हटलं पाहिजे !

**गजा० :** हो, जगाच्या इतिहासांत अजरामर होईन मी! जगांतले सारे कार्यकर्ते माझ्या या भाग्याचा हेवा करतील. अशी पत्नी जन्मोजन्मीं लाभावी म्हणून सारेजण तपश्चर्या करतील! चल, उगीच उशीर करूं नकोस. मला पोलीसच्या स्वाधीन तरी कर, नाहींतर मला स्टेशन तरी गाठूं दे.

**शारदा :** कुठं निघून जाणार आहां तुम्हीं ?

**गजा० :** पोलीसाच्या माणसांना आमचे पत्ते सांगत नसतों आम्हीं.

**शारदा :** बायकोला ?

**गजा० :** कोण कुणाची बायको ? नवऱ्याला पोलिसाच्या हवालीं करण्यासाठीं उत्सुक असलेल्या स्त्रीला बायको म्हणतात ? हंः—मग जगांतल्या साऱ्याच शब्दांचे अर्थ बदलावे लागतील.

**शारदा :** मी पत्ता सांगितला नाहीं, म्हणून पोलीसांना तो कळणं मुष्कील होणार नाहीं.

**गजा० :** पोलीस त्याच कामगिरीवर नेमलेले असतात.

**आबा :** यापुढं तें काम बायकांना द्यायला हरकत नाहीं सरकारला !

**गजा० :** चल, आटप लवकर. उगीच उशीर करूं नकोस.

**शारदा :** इतकी घाई झाली आहे तुम्हाला पोलीसांच्या स्वाधीन व्हायची ?

**गजा० :** हो; कारण त्यांनीं मला ओळखून पकडलं, तर तुझं श्रेय नाहीसं होईल. नवऱ्याला पकडून देणारी बायको म्हणून तुझं सरकार जें कौतुक करील, त्याला तूं मुकूं नयेस म्हणून मी घाई करतों आहे.

**शारदा :** ( क्षणभर थांबून ) पोलीसांनीं तुम्हांला ओळखलं नाहीं तर कुठं जाणार तुम्हीं ?

**गजा० :** सांगितलं ना मी—पोलीसाच्या माणसांना आम्ही आमचे पत्ते सांगत नसतो.

**शारदा :** तुम्हांला गेलंच पाहिजे का ?

**गजा० :** अर्थातच.

**शारदा :** माझ्यासाठींही तुम्ही थांबणार नाहीं ?

**गजा० :** तुझ्यासाठीं ?

**शारदा :** हो—मी तुमची बायको आहे, मला तुमच्याबरोबर सारा जन्म काढायचा आहे—

**गजा० :** मी तुला घरांतून जायला सांगितलं नव्हतं !

**शारदा :** तुम्हीं सांगितलं नाहीं—पण मला जायला तुम्हीं भाग पाडलंत. तुमच्या पार्टींत मला यायला सांगत होतां तुम्हीं.

**गजा० :** आणि अजूनही सांगतों. कारण माझ्या खांद्याला खांदा लावून लढण्यांतच तुला माझ्याबरोबर आयुष्य काढतां येईल. इतर चारचौघांसारखा माझ्याशीं संसार करावा, अशी तुझी इच्छा असेल तर ती मला पुरवतां येणं शक्यच नाहीं. मी ज्या कार्याला वाहून घेतलं आहे, तोच माझा संसार. आणि तुला माझ्याबरोबर जन्म काढायचा असेल तर आपणां दोघांनाही हाच संसार चालवावा लागेल.

**आबा :** आहे का तुझी तयारी? डोंबाऱ्याचा संसार आहे हा! आज मुंबईत—उद्यां कलकत्त्याला—आणि परवा मद्रासला. सतीचं वाण आहे हें!

**शारदा :** ठीक आहे. आहे माझी तयारी. चला.

**सुनंदा :** कुठं चाललीस?

**शारदा :** हे नेतील तिथं. यांच्याशीं संसार करायला.

**आबा :** अग, पण जाणार तर अशी नुसती जाऊं नकोस—बुरखा घेऊन जा! मुसलमान झाला आहे तो आतां! हो—नाहीं तर कुणाला वाटायचं, हा हिंदु मुलीला पळवून नेतो आहे कीं काय?

**सुनंदा :** आणि त्या संशयानं कुणी यांना पोलीसाच्या ताब्यांत द्यायचा!

**आबा :** एकूण काय—तुमच्या मागचा पोलीस कांहीं सुटत नाहीं.

**गजा० :** माझी तयारी आहे त्याला आतां.

**सुनंदा :** अहो—पण यांना तरी सांगून जा.

**गजा० :** खरंच—द्वारकानाथ, द्वारकानाथ—( द्वारकानाथ येतो )

**सुनंदा :** आले एकटे—आणि चालले बायकोला घेऊन.

**द्वारका० :** म्हणजे?

**गजा०** : नवीन मिळवली नाहीं कांहीं !—हरवली होती ती सांपडली.

**द्वारका०** : आणि कुठं नेणार तू यांना ? अरे, संमेलन आहे त्यांचं बडोद्याला.

**गजा०** : तिथंही जाऊं कदाचित ! आतां काय—आबांनीं म्हटल्याप्रमाणें डोंबाऱ्याचा संसार ! आज काय मुंबई—उद्यां बडोदा—परवा लखनौ—

**द्वारका०** : च् च्—महाराष्ट्र साहित्याचं एक दालन मात्र तसंच बंद राहिलं !

**गजा०** : कुलुप ठोक त्याला आतां ! ( हंसत हंसत दोघे जाऊं लागतात )

**आबा** : अरे, जातांना म्हाताऱ्याचा आशीर्वाद तरी घेऊन जा, ( दोघेही मागे फिरून नमस्कार करतात ) केलांत कां नमस्कार ? पोराबाळांचा आशीर्वाद द्यायची कांहीं सोय नाहीं तुम्हांला. हो—तें आणखी लटांबर कुठं कुठं घेऊन जाणार ?

( सर्व हंसतात. )



# दिग्दर्शनाच्या सूचना

पडदा उघडतो तेव्हां आडकित्त्यानें सुपारी फोडित आंधळे आबा रॉकिंग खुर्ची हालवीत बसले आहेत. त्यांच्या उजव्या बाजूस बैठकीवर बसलेली सुनंदा वर्तमानपत्रांतील बातमी वाचीत आहे. "तीन डोळ्यांचें विचित्र मूल" आबा 'हं' असा प्रश्नार्थक चेष्टेचा उद्गार करतात. तीही मान हालवून हंसत पुढील मजकूर वाचूं लागते. प्रत्येक वाक्यावर आबांचा चेष्टेचा उद्गार चालूच असतो. "असं का?" "अरे वाः!" "छान" वगैरे.

बातमी संपतांच आबा बोलतात व हसतात. सुनंदाही मर्याद-शीलपणानें हंसते. आबा कातरलेली सुपारी तोंडांत टाकतात आणि पानाला चुना लावूं लागतात, सुनंदा वर्तमानपत्रावरून नजर फिरवून एके ठिकाणीं थांबते व म्हणते "दिल्लींत खळबळ!" हें ऐकतांच चुना लावण्याचें आणि खुर्ची हालविण्याचें एकदम थांबून ते विचारतात, "कां ग?"

आणि तिचें उत्तर ऐकल्यांवर "हं...हं..." असें म्हणूत पुन्हा खुर्ची हालवूं लागतात व पानाला चुना लावूं लागतात. नंतर पानाबरोबर कातांचा खडा तोंडांत टाकून चंची गुंडाळीत म्हणतात, "त्या गांधीची कांहीं बातमी आहे का पहा."

सुनंदा "हो" म्हणते. ते म्हणतात, "काय वाच पाहूं." एवढ्या वेळांत चंची मांडीवर ठेऊन दोन्ही हात खुर्चीवर ठेवून ते पान खात आरामशीर डुलत राहातात. "...पोलिसाच्या

हवालीं करणं योग्य होईल काय ?" हें ऐकतांच आबा मध्येंच म्हणतात, " हं मग काय म्हणाले गांधीजी ?"

" ते म्हणाले, अर्थातच." यावर आबा उद्गारतात, 'असं ?'

" ...तरी त्याला पकडून पोलिसाच्या हवालीं करा" हे उद्गार ऐकून मान हालवीत आबा म्हणतात, " अरे वा !"

नंतर " मला भेटायला हवा तो गांधी एकदा" असें म्हणतांच ते उठतात, खुर्चीला लाऊन ठेवलेली काठी चांचपडत हातांत घेतात आणि खिडकीच्या दिशेनें चालूं लागतात. सुनंदाही उठून त्यांच्या मागोमाग हळुहळु चालते. तीं दोघेही चालतां चालतां बोलतात. आबा खिडकीजवळील प्रशस्त खुर्चीवर जाऊन बसतात. ते आंधळेपणाचे फायदे सांगतात, त्यावेळीं सुनंदा मधल्या राऊंड टेबलाजवळ फुलें रचल्यासारखें करीत उभी राहते व मधून मधून स्मित करून त्यांचें बोलणें ऐकते. " तो पाहुणा गेला कीं आहे अजून ?" हे आबांचे शब्द ऐकतांच ती तेथून पुढें येते व माडीच्या जिन्याकडे पाहून म्हणते, " आजच जाणार आहे."

" तो कांहीं असा तसा माणूस नाहीं." हे आबांचे शब्द ऐकून ती थोड्याशा आश्चर्याच्या मुद्रेनें त्यांच्या जवळ जाऊन उभी राहाते. नंतर दोघेंही त्याच जागीं राहून बोलतात, " हा आबा नाहीं फसायचा" असें म्हणून आबा काठी घेऊन उठतात व आंतल्या खोलीकडे जाण्यासाठीं चालूं लागतात. त्यांच्या मागोमाग चालत सुनंदा त्यांना प्रश्न विचारते. तेही मध्यें थांबून तिला उत्तर देतात व पुढें चालू लागतात. ते आंतल्या खोलींत निघून गेल्यावर सुनंदा त्यांच्या उद्गाराचा विचार करीत तशीच उभी राहाते व नंतर बुकस्टँडमधील एकदोन पुस्तकें काढून बाहेरच्या दरवाजाकडे पाहात मधल्या राऊंड टेबलावर ठेवते.

जिन्यावरून सिगरेट पेटवीत हळुहळु येत असलेल्या द्वारकानाथाकडे अर्थपूर्ण, शोधक नजरेनें पाहात ती विचारते, "तुमचे पारशी पाहुणे आले नाहींत अजून?" त्यावेळीं पारशी शब्दावर ती थोडासा हेतुपूर्वक जोर देते. पण तें त्याच्या लक्षांत येत नाहीं. तो बोलत बोलत बाहेरच्या दरवाजापर्यंत जातो व दूरवर पाहून पुन्हां हळुहळु येऊन रॉकिंग चेअरवर बसतो. ती मुद्दामच त्याच्या खुर्चीमागे उभी राहून तिला झोके देत, त्याच्याकडे रोखून पाहात विचारते, "सरदारगृहांत पारशांना उतरायला देतात?" तो नेहमीच्या खेळकर वृत्तीनें उत्तर देतो. पण "तुमचा हा पारशी पाहुणा खराच पारशी आहे ना?" ह्या तिच्या प्रश्नावर तो जरा चमकतो व म्हणतो, "सोराब कापडिया होय?" ती म्हणते, "तो सोराब कीं रुस्तुम आहे—कीं दोन्ही नाहीं—"

एवढें होईपर्यंत तो जरा नर्व्हस होऊन खुर्चीवरून उठून मागें येतो व बुकस्टँडजवळ पुस्तकें चाळण्याचें सोंग करतो. नंतर विषयांतर करण्यासाठीं तेथून मधल्या राऊंड टेबलाकडे येत त्यावरील पुस्तकें उचलून म्हणतो, "हीं पुस्तकं मुद्दामच इथं ठेवलीं आहेस वाटतं आज?"

तीहि त्याच्या जवळ येत हंसून उत्तर देते.

"सारा बनवाबनवीचा प्रकार" असें म्हणून सिगरेट ओढीत तो बाहेरच्या दरवाजाजवळ जाऊन बाहेर पाहातो. ती तेथूनच त्याच्याकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहून म्हणते, "हो, अलिकडे पाहावी तिथं बनवाबनवी चालली आहे—"

तो बिचकून तिच्याकडे कटाक्ष टाकतो व विषयांतर करण्यासाठीं तिच्याजवळ येऊन पुस्तकें चाळीत म्हणतो, "काय भयंकर कादंबरी लिहिली आहे!"

नंतर पुस्तक तेथेंच टाकून बोलत बोलत तो पुन्हां रॉकिंग

चेअरवर येऊन बसतो ती बोलत बोलत त्याच्या मागें येऊन उभी राहाते.

“ चार बायका रंगांत आल्या म्हणजे—” हें तिच्या तोंडचें वाक्य ऐकतांच तो खुर्ची हालविण्याचें एकदम थांबवून चेष्टेनें उद्गारतो, ‘ काय म्हणतेस ? ” आणि नंतर हंसत हंसत पुन्हां खुर्ची हालवूं लागतो. नंतर “ काय ग, तुझ्या या मैत्रिणीचं लग्न झालं नाहीं वाटतं ? ” असें म्हणत तो उठतो व ‘ फूटलाइट ’ला समांतर हलके हलके चालूं लागतो. ती तेथेंच खुर्चीमागे उभी राहून बोलत असते, चालतां चालतां ‘ म्हणजे ? ’ असें तिच्याकडे बघून तो विचारतो व थांबतो. व ‘ तरीच ’ असें चेष्टेनें म्हणून बाहेरच्या दरवाजाजवळ गजानन येतांना दिसतो कीं काय तें पाहाण्यासाठीं जातो. मधून मधून सिगरेट ओढीत तो तेथेंच उभा राहून बोलत असतो.

सुनंदा विचारते, ‘ तुमचा कापडिया का धोतरिया लग्नावांचून राहिला आहे वाटतं अजून ? ”

त्याचा उल्लेख झाला कीं द्वारकानाथ चपापतो व तिच्याकडे पाहिलें न पाहिल्यासारखें करून विचारतो, “ कां—तसं म्हणाला तो ? ”

असें म्हणून तो आतां खिडकीजवळच्या प्रशस्त खुर्चीकडे येतो व तिच्या हातावर बसून पुढचे संवाद बोलतो. नंतर तिच्या एक एक खोंचक प्रश्नांनीं तो जास्तजास्तच नर्व्हस होत असलेला दिसतो. तिनें “ पक्का पारशी दिसतो ” असें मुद्दामच म्हणतांच “ तर ! ” असें म्हणून तो खिडकीबाहेर सिगरेट फेकून माडीवर जायला निघतो. ती त्याच्यामागें हळुहळु चालत जात बोलते, “ हल्लींच्या युगांत......”

तिला उत्तर देण्यासाठीं तो थांबतो, पण तिच्याकडे पाहाण्याचें

टाळतो. " गाडीची वेळ होत आली आहे त्याची " असें म्हणून तो जिन्याच्या पायऱ्या चढूं लागतो व कसलासा आवाज ऐकून वळून म्हणतो, " आला वाटतं ? "

एका हातांत पर्स व दुसऱ्या हातांत लहानशी हँडबॅग घेऊन शारदा बाहेरच्या दरवाजांतून येते. सुनंदा तिच्याकडे लक्ष जातांच " अय्या, शारदा—" असें म्हणत तिच्याजवळ जाते व तिच्या हातांतली बॅग घेत दरवाजाकडे पाहून म्हणते, " सामान नाहीं वाटतं तुझ्याबरोबर ? "

द्वारकानाथ भुंवया थोड्याशा आकुंचित करून शारदेकडे पाहात थोडा पुढें येतो. शारदा पर्समधला रुमाल काढून कपाळा-वरचा घाम टिपीत पुढें येत म्हणते, " अग मी का राहायला आलें आहे ?..."

बोलतां बोलतां द्वारकानाथाकडे लक्ष जाऊन ती म्हणते, " हे तुझे मिस्टर वाटतं ? "

हातांतली बॅग मधल्या राउंड टेबलावर ठेऊन मानेनें हो म्हणते व तो खोटें हंसून " हो " म्हणतो.

शारदा इकडे तिकडे पाहात म्हणते, " चांगली आहे बाई जागा तुझी. " त्यावर सुनंदा म्हणते, " मग राहा ना चार दिवस. " तोही खोटेंखोटे हंसत म्हणतो, " राहा ना. " सुनंदा हळुच चोरट्या नजरेनें त्याच्याकडे पाहून हंसते. शारदा खिडकी-जवळच्या खुर्चीच्या हातावर बसत म्हणते, " संमेलनाला जायला आलें आहे मी......"

नंतर राउंड टेबलावरील आपल्या पुस्तकांकडे नजर जाऊन उठत ती टेबलाजवळ येत म्हणते, " ॲह—जशी कांहीं माझींच पुस्तकं वाचतेस रोज. "

सुनंदा त्याच्याकडे कटाक्ष टाकीत म्हणते, " विचार यांना. "

द्वारकानाथ तिची बाजू घेत म्हणतो, "हो हल्लीं संसाराकडे-सुद्धां लक्ष नाहीं हिचं—"

बोलून झाल्यावर सुनंदाकडे पाहून हळुच डोळे मिचकावतो. शारदा खुर्चीवर बसते, व रुमालानें वारा घेते.

द्वारकानाथ :—"तुम्हीं नाहीं वाटतं तुमच्या कविता गात?"

सुनंदा त्याच्या मागें उभी राहून त्याचा शर्ट हळुच ओढून थट्टा न करण्याबद्दल त्याला खुणावते. तो मागल्या हातानेंच गप्प राहाण्यास खुणावतो. यावेळीं तो शारदेच्या खुर्चीच्या अलीकडच्या खुर्चीजवळ येऊन उभा राहिलेला असतो. खुर्चीवरचें पुस्तक उचलून शारदेच्या मागें जाऊन उभ्या राहिलेल्या सुनंदाकडे कटाक्ष फेकून तो शारदेला म्हणतो, "बाकी तुमची कादंबरी आम्हांला खूप आवडली."

शारदा उत्सुकतेनें विचारते, "हो का?"

आणि त्यानें तिची जास्त चेष्टा करूं नये म्हणून, सुनंदा तिचा हात धरून तिला उठवीत म्हणते, "चल, तोंडबिंड तरी धुवून घे."

शारदा उठून पण आपला हात सोडवून घेत विचारते, "खरंच?"

द्वारकानाथ गंभीर चेहरा करीत उत्तर देतो, पुस्तक खुर्चीवर टाकतो आणि नंतर दोन्ही हात झाडतो. शारदेला त्याची चेष्टा लक्षांत न आल्यामुळें ती गंभीरपणानें बोलत असते. ती म्हणते "...तरच तें जिवंत वाङ्मय."

तो एकदम म्हणतो, "अलबत. अशीं दहा पांच पुस्तकं निघालीं..."

शारदाः—"लिहिणारच आहे मी!"

तो लगेच म्हणतो, “लिहाच तुम्हीं” आणि सुनंदाकडे कटाक्ष फेंकतो. शारदा आपल्यावर लोक कसकशी टीका करतात तें सांगते तेव्हा तो “ असं ! ” “ छेः, ”, “कांहींतरीच” असे उद्गार काढतो. पण त्यांचा एकंदर रोख चेष्टेचा असतो.

शारदा म्हणते, “ कला म्हणजे कला. ”

तोही तिला साथ देण्यासाठीं तिच्याबरोबर “ कला ” असें उच्चारतो.

“ आतां हीच तुमची कादंबरी ” असें म्हणत तो राउंड टेबलावरचें दुसरें पुस्तक उलचतो व तिच्याजवळ येत भराभर पानें चाळीत बोलूं लागतो. सुनंदा त्याच्या मागें उभी राहून त्याचा शर्ट ओढून त्याला गप्प राहाण्यास खुणावते व तो मागल्या हातानेंच तिला ‘ थांब ’ म्हणून सांगतो. “अगदीं नॅचरल ” असें म्हणून तो पुस्तक खुर्चीवर टाकतो आणि मघासारखेच दोन्ही हात झाडतो, जणूं काय तीं पुस्तकें घाणीने बरबटलीं आहेत. सुनंदा तिला त्याच्या चेष्टेंतून सोडविण्यासाठीं तिचा हात धरून ओढीत म्हणते, “ तुला कपडे बदलायचे नाहींत का ! ”

तिला ओढून नेतांना शारदा चेष्टा करण्यासाठीं हंसत म्हणते, “ किती मुलं झालीं तुला ! बटाटे शेर कसे मिळतात !......”

त्या दोघांकडे द्वारकानाथ पाहात राहातो व नंतर मान हाल-वीत, स्वतःशींच हंसत माडीवर जाऊं लागतो. तोंच चाहूल लागून तो मागें वळून पाहतो. गजानन पारशी कपडे पेहेरून व खाकेत चामड्याची बॅग घेऊन मागें पाहात येतो. द्वारकानाथ त्याच्याजवळ येत थट्टेनें विचारतो, “ केम बाबा, आव्या के तमे ”

तोही सस्मित चेहऱ्यानें उत्तर देतो. दोघेही हंसतात. द्वार-

नाथ त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणतो, " अगदीं नखशिखांत पारशी झाला आहेस तूं गजा. "

तो चिंतायुक्त चेहरा करून उत्तर देतो, " आतां मुसलमान होऊन बाहेर पडणार आहे. " मग गजानन 'फूटलाइट' जवळ येऊन हकीकत सांगतांना, ती कोणी ऐकत तर नाहीं, या संशयानें द्वारकानाथ मधूनमधून आंतल्या दरवाजाकडे पाहतो. अखेर द्वारकानाथ " चल, जेवण तयार आहे वर " असें म्हणत त्याला घेऊन माडीवर जाऊं लागतो. तेव्हां गजाननचें राउंट टेबलावरील शारदेच्या हँडबॅगकडे लक्ष जातें व तो संशयानें इकडे तिकडे पाहात विचारतो, " कुणी आलं आहे वाटतं ? "

द्वारकानाथ त्याची समजूत घालतो व गजानन माडीवर जातो. त्याचवेळीं चहाचा घोट घेत घेत शारदा आपल्या खोलींतून येते. तिच्या मागोमाग सुनंदा येते. शारदेचें माडीवर जात असलेल्या गजाननकडे ओझरतें लक्ष जातें. द्वारकानाथ हें पाहातो. ती बोलत बोलत पुढें येते व राउंड टेबलापुढे उभी राहून चहा पिते. द्वारकानाथ रायटिंग टेबलाजवळ चाळवाचाळव करीत उभा असतो व दोघांच्यामध्ये सुनंदा उभी असते. " मग हरकत नाहीं " म्हणून शारदा चहाचा रिकामा कप राउंड टेबलावर ठेवते व खिडकीजवळच्या खुर्चीच्या हातावर जाऊन बसते.

द्वारकानाथ थोडा पुढे येऊन " नाहीं म्हणजे–तुम्हीं–ही कायसंसं म्हणत होती—" असें गोंधळून बोलतो. शारदा खण-खणीत आवाजांत गंभीरपणानें विचारते, " काय म्हणायचं आहे तुम्हांला ? "

" ऐका " असें म्हणून ती उठते व पुढं फूटलाइटकडे जात कपाळाला आंठ्या घालून बोलूं लागते. सुनंदाही तिच्या मागोमाग तिच्याजवळ जाते. द्वारकानाथ रॉकिंग चेअरच्या मागे उभा

असतो. गंभीरपणानें तिची हकीकत ऐकत असल्याचा तो अभिनय करतो व मध्यें मध्यें हुंकार देतो. ती आवेशानें बोलत असते. "एका वस्त्रानिशीं निघून आईकडे आलें." असें म्हणून ती खिडकीजवळच्या भिंतीला टेकून असलेल्या खुर्चीत जाऊन बसते. सुनंदा तिच्यापासून दूर राहून विचारते, "त्यानंतर तुझी त्यांची गाठ पडली नाहीं?"

ती म्हणते, "असतील कुठें तरी खडी फोडीत."

यानंतर थोडावेळ शांत असतें. नंतर द्वारकानाथ हुंकार देऊन म्हणतो, "अस्सं—एकूण तुमच्या लेखनाचं हें उगमस्थान?"

शारदा उठून पुढें येत म्हणते, "अहो, मनाचा कोंडमारा कुठवर सहन करायचा?

आबा आंतून बोलत येतात. सुनंदा त्यांना वाट दाखविण्यासाठीं पुढें होते. शारदा त्यांच्याकडे पाहाते. आबा येऊन रॉकिंग चेअरवर बसतात. ते शारदेच्या नवऱ्याचा उल्लेख करतात तेव्हां सुनंदा व द्वारकानाथ परस्परांकडे पाहातात.

नंतर आबा गजाननाबद्दल प्रश्न विचारतात व द्वारकानाथ माडीवर गेल्यावर थट्टेच्या आवाजांत म्हणतात, "हो, विमा उतरतो तो...पान तंबाखूही खातो."

आबा :—"तें त्याला माहित आणि द्वारकानाथाला माहित..." असें म्हणत रॉकिंग चेअरवरून उठून खिडकीजवळच्या खुर्चीकडे जाऊं लागतात. सुनंदा पुढे येऊन त्यांना वाट दाखवते. ते खुर्चीत जाऊन बसतात. सुनंदा पुन्हां शारदेजवळ राउंड टेबलाजवळ येते.

गजानन आणि द्वारकानाथ माडीवरून येईपर्यंत त्यांचें त्याच जागेवरून संभाषण चालतें. गजानन मुसलमानी वेषांत व

द्वारकानाथ अंगांत कोट चढवीत येतो. सुनंदा त्याचा मुसलमानी वेष पाहून चकित होते. गजाननच्या हातांत एक मोठी कपड्याची बॅग आहे. शारदा दुरूनच त्याच्याकडे पाहाते. ती थोडीफार चमकते. द्वारकानाथ व गजानन बाहेरच्या दरवाजाकडे येऊं लागतात तेव्हां वाटेंत उभ्या असलेल्या शारदेकडे लक्ष जाऊन द्वारकानाथ तिला म्हणतो, " एक्स्क्यूज हं—"

गजाननची व तिची दृष्टादृष्ट होते. तो बिचकतो. ती त्याच्यावरून नजर काढून दुसरीकडे पाहाते. नंतरच्या आबांच्या व द्वारकानाथच्या बोलण्याकडेही दोघांचें लक्ष नसतें. गजानन मधून मधून तिच्याकडे पाहातो. पण ती त्याच्याकडे पाहात नाहीं.

शारदा :–इथं टेलिफोन नाहीं वाटतं ? तिच्या आवाजांतला कठोरपणा पाहून सुनंदा तिच्याजवळ येते. शारदा कठोरपणानें बोलत असते. तिनें गजानन हा फरारी माणूस आहे, हें ओळखलें, हें द्वारकानाथाच्या लक्षांत येतें व तो गोंधळतो. " चल, जाऊं आपण " असें म्हणून तो गजाननचा हात धरून बाहेरच्या दरवाजाकडे जाऊं लागतो, तेव्हां शारदा मध्यें उभी राहून म्हणते, " मी कळवल्यावांचून राहीन असं वाटतं तुम्हांला ? "

द्वारकानाथ तिला चुचकारण्यासाठीं नरमाईनें विचारतो, ' या बिचाऱ्यानं काय गुन्हा केला आहे तुमचा ? "

शारदा पुढें येऊन खुर्चीमागें उभी राहून ठांसून म्हणते, " माझा केला नसला......"

तो व ती बोलत असतांना गजानन खालीं मान घालून उभा असतो व मधून मधून शारदेकडे कटाक्ष टाकतो.

द्वारकानाथ :–" याला बायकोच नाहीं." असें म्हणतो, तेव्हां ती मागें वळून गजाननकडे रोखून पाहात विचारते, " मेली ? "

गजानन तिचा नवरा असतांना ती त्याला पोलिसाच्या स्वाधीन

करूं पाहाते, हें पाहून द्वारकानाथ तिटकारा व्यक्त करून माडीवर जातोच, पण सुनंदालाही शारदेचा राग येतो व ती तो आपल्या बोलण्यांत व्यक्त करते. शारदेपासून ती दूर उभी राहाते. शारदा स्टेजच्या मधोमध असते. गजानन बाहेरच्या दरवाजाजवळ उभा असतो. आबा त्याच खुर्चीवर बसलेले असतात.

सुनंदाचे उद्गार ऐकून शारदा थोडीशी नरम पडते व विचारते: "कुठं निघून जाणार तुम्हीं?"

"बायकोला?" हा प्रश्न तर ती मृदु स्वरांत विचारते, गजानन तिच्याकडे न पाहातां उत्तरें देतो.

त्या दोघांचा संवाद सुनंदा मूळच्याच जागीं उभी राहून ऐकत असते. शारदा नरम आली आहे, हे तिच्या हळुहळु लक्षांत येतें.

शारदाः—"ठीक आहे. चला." असे म्हणून राउंड-टेबलावर टाकलेली पर्स व हॅंडबॅग उचलते व गजाननकडे येते. सुनंदा समाधानी चेहऱ्यानें पुढे त्यांच्यापाशी येऊं लागते.

द्वारकानाथाला हांक मारल्यावर तो खाली येतो तेव्हां तो घुश्शांतच असतो. त्याला खरी हकीकत कळतांच तो पुढें येत चेष्टेनें बोलूं लागतो. सुस्कारा सोडून तो म्हणतो, "च् च्— महाराष्ट्र साहित्याचं एक दालन मात्र तसंच बंद राहिलं."

सुनंदा तिच्याकडे बघून हंसते.

आबांना वांकून तीं दोघें नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतल्यावर जाऊं लागतात, तेव्हां द्वारकानाथ व सुनंदा त्यांना निरोप द्यायला दरवाजाजवळ येतात. द्वारकानाथ लाबूनच "केम बाबा" अशी गजाननला हांक मारतो व त्यावर सुनंदा हंसते व हात हालवून शारदेला निरोप देते.

**पडदा पडतो.**

मो. ग. रांगणेकर यांच्या

आणखी पांच एकांकिका

- तुझं माझं जमेना
- सतरा वर्षें
- येथें नवरे मिळतात
  (फक्त स्त्रियांसाठी)
- वर पाहिजे !
  (फक्त पुरुषांसाठीं)
- पहिली तारीख
  (मुलांमुलींसाठीं)

रामकृष्ण बुक डेपो
गिरगांव : मुंबई ४

मूल्य – १२ आणे